**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ यांच्याकरिता संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे पद मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र.ई-७२५२०२/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०८ मे, २०२४

<u>वाचा</u> :-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दि. ०८.०३.२०१
२) वित्त विभाग परिपत्रक क्र.संकीर्ण २०२३/ प्र.क्र.६९/ आ.पु.क. ,दि. २९.१२.२०२३

**<u>प्रस्तावना</u> :-**

सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६ मधील तरतूदीनुसार संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे सांविधिक पद आहे. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ यांच्याकरिता यापूर्वी संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे पद मंजूर करण्यात आले नव्हते. संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे पद निर्माण केल्यामुळे विद्यार्थ्यांना ग्रंथालयाची सेवा उपलब्ध करुन देणे शक्य होणार आहे. उपरोक्त बाबी विचारात घेऊन, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ यांच्याकरिता संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे पद मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे:-

**शासन निर्णय:-**

१. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ यांच्याकरिता संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे पद मंजूर करण्यास तसेच, त्याकरिता निर्माण होणारा वार्षिक रु. २५,९७,७३६/-इतका आर्थिक भार स्विकारण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर पदाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनस्तर | संख्या |
|---|---|---|---|
| १. | संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र | Academic level 14 with rationalized entry pay of Rs. 1,44,200/- | १ |

२. वित्त विभागाच्या दि. २९.१२.२०२३ च्या परिपत्रकान्वये अकृषि विद्यापीठातील सांविधिक पदे भरण्याचे कायमस्वरुपी अधिकार उच्च व तंत्र शिक्षण विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ यांच्या करिता निर्माण करण्यात आलेले संचालक, ज्ञानस्त्रोत केंद्र हे सांविधिक पद भरण्यास मान्यता देण्यात येत आहे. विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन सदर पद भरण्याची कार्यवाही विद्यापीठाने तातडीने करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं/२२४/आपुक, दि.१६.०४.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०५०८१६४२५३४००८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.05.08 16:56:22 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व परीक्षा), १/ २ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/ २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११. सर्व उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कुलगुरू, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ,सोलापूर
१३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
१५. कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ,सोलापूर
१६. निवड नस्ती (विशि-१)